**मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी बसविण्यात आलेल्या सीसीटीव्ही कॅमे-यांचे देयक अदा करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३११९/प्र. क्र. १२१/पोल-३**
गृह विभाग, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०४.११.२०१९.

वाचा -

१) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आयएसएस १००९/प्र.क्र.३१३/विशा-४, दि.२७.०७.२०११.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.आयएसएस-१००९/प्र.क्र.३१३ (भाग-२)/विशा-४, दि.६.०१.२०१२.
३) महाराष्ट्र शासन आणि मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी यांचे दरम्यान दि.७.२.२०१५ रोजी झालेला करार.
४) शासनाचे क्र.सीसीटी ३११५/प्र.क्र.२१/पोल-३,दि.७.२.२०१५ चे कार्यादेश.
५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.४.२०१७
७) गृह विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र. क्र. ६४/विशा -३(अ), दि.०४.०८.२०१७.
८) गृह विभाग, शासन पत्र क्र.३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दिनांक ०८.११.२०१७.
९) गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दि.०५.११.२०१८.
१०) उच्चस्तरीय शक्ती प्रदान समिताच्या दि.०५.११.२०१८ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
११) प्रकल्प संचालक, मे.लार्सन अँड टुब्रो कंपनीचे दिनांक १६.१०.२०१९ रोजीचे पत्र व त्यासोबत सादर देयके.
१२) प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीने दिनांक १६.१०.२०१९ रोजीच्या ई मेल संदेशाद्वारे सादर केलेला अहवाल.

प्रस्तावना-

मुंबई शहरात सुरक्षेच्या दृष्टीने सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी मे. लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनी लि. या कंपनीसोबत दि.०७.०२.२०१५ रोजी शासनाने करार केला आहे. सदर करारानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाची एकूण किंमत रु.९४९ कोटी एवढी ठरविण्यात आली आहे. सदर प्रकल्पासाठी गृह विभाग, शासन निर्णय दि.०६.०१.२०१४ अन्वये एकूण रु.६०० कोटी एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तद्नंतर गृह विभाग शासन निर्णय दि.०२.३.२०१६ अन्वये रु. ३४९ कोटी एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.तद्नंतर गृह विभाग शासन निर्णय दि. ०५.११.२०१८ अन्वये रु.९८०,३३,८०,०२४/-(अक्षरी रुपये नऊशे ऐंशी कोटी तेहतीस लाख ऐंशी हजार चोवीस) एवढया रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तदनंतर गृह

विभाग शासन निर्णय दि. २६.०२.२०१९ अन्वये रु.१३०३.५६ कोटी(अक्षरी रुपये एक हजार तीनशे तीन कोटी छप्पन लाख ) एवढ्या रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्प दि.०५.०९.२०१७ पासून कार्यान्वित (Go-Live) झाला असे दिनांक ०८.११.२०१७ च्या पत्रान्वये घोषित करण्यात आले आहे.

मे. लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनीमार्फत मुंबई सीसीटीव्ही संनिरीक्षण प्रकल्पासाठी अतिरिक्त ४४८ कॅमेरे तात्पुरत्या स्वरुपात बसविण्यात आले होते ,उच्च शक्ती प्रदत्त समितीच्या दि.०५.११.२०१८ रोजीच्या बैठकीत सदरचे अतिरिक्त ४४८ कॅमेरे कायमस्वरुपी करण्याबाबत व यासाठी येणा-या रु.१४.०६ कोटी एवढ्या खर्चास मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीने उपरोक्त संदर्भाधीन क्र.१२ येथील दि.१६.१०.२०१९ रोजी सादर केलेल्या अहवालानुसार अतिरिक्त ४४८ सीसीटीव्ही कॅमे-यांसाठी कॅपेक्स भागाकरिता रु.५,६०,८४,१७३/- व तिमाही एक ते तिमाही सात(Quarter १ to Quarter ७) पर्यंतचा कार्यान्वयन खर्च रु.२,७३,६२,०६६/-अशी एकुण रु.८,३४,४६,२३९/- एवढी रक्कम देय होत आहे. सदर अहवालानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या बसविण्यात आलेल्या अतिरिक्त ४४८ सीसीटीव्ही कॅमे-यांना मान्यता देऊन मे.लार्सन ॲण्ड टुब्रो कंपनी लि. या कपंनीला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी लि. व शासन यांच्यामध्ये दि.०७.०२.२०१५ रोजी मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासंदर्भात करार झालेला आहे. मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाकरिता बसविण्यात आलेल्या अतिरिक्त ४४८ सीसीटीव्ही कॅमे-यांसाठी कॅपेक्स भागाकरिता रु.५,६०,८४,१७३/- व तिमाही एक ते तिमाही सात(Quarter १ to Quarter ७) पर्यंतचा कार्यान्वयन खर्च रु.२,७३,६२,०६६/- अशी एकुण रु.८,३४,४६,२३९/- (रुपये आठ कोटी चौतीस लाख सेहचाळीस हजार दोनशे एकोणचाळीस) एवढी रक्कम वितरित करण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कमेची देयके कंपनीला अदा करतांना आयकर व इतर प्रचलित कर वजाती करुन अदा करण्यात यावी.तसेच सदर रक्कमेच्या देयकात जीएसटीचा (वस्तु व सेवा कर) समावेश नाही.

३. प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च हा “मागणी क्र.बी-१०, ४०५५ - पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत ५२- यंत्रसामग्री साधनसामग्री”या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदरहु रक्कम आहरीत करण्यासाठी पोलीस आयुक्त, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिका-याला आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषीत करण्यात येत आहे. त्यांनी उपरोक्त निधी प्रकल्प संचालक Larsen & Toubro Ltd.-SW&C BU या

कंपनीच्या १६३, अन्नासलाई, चेन्नई-६०० ००२ येथील सीटी बँकेच्या शाखेचे खाते क्र.0521466308 (IFSC Code - CITI0000003) (MICR CODE OF THE BANK-600037002) या खात्यावर जमा करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२,दि.१७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनु.क्र. २७ अ, नियम क्र.७६ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०४१७४८५१११२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, street=MAIN BUILDING, 2ND FLOOR,MANTRALAY,MUMBAI, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2019.11.04 17:53:29 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. पोलीस आयुक्त, मुंबई.
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२.मे. लार्सन अँड टुब्रो कं. लि, एल अँड टी हाऊस, एन. एम. मार्ग, बलार्ड इस्टेट, मुंबई-१.
१३.मे.प्राईसवॉटर हाऊस कुपर्स लि., २५२, वीर सावरकर मार्ग, दादर (प), मुंबई-४०० ०२८.
१४.वित्त विभाग, व्यय-७/वित्तीय सुधारणा.
१५. अर्थसं-१/गृह विभाग, मुंबई.
१६. रोख शाखा/ गृह विभाग, मुंबई.
१७. निवडनस्ती, पोल-३.